# महाराष्ट्र शासन

क्रमांक : गौखनि -१०/०२१७/प्र.क्र.१०६/ख

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ०६/०२/२०१९.

**विषय : गौण खनिज-पुणे**

सन २०१३-१४ या वर्षामध्ये मौजे कुंभारगाव, ता. इंदापूर या वाळूगटाच्या लिलावाची तसेच व्याजाची रक्कम परत करण्याबाबत.
श्री. सदिप संभाजी फराटे.

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी पुणे यांना त्यांचे पत्र क्रमांक/गौखनि/कावि/१७८८/२०१६, दि.४/८/२०१६, क्रमांक/गौखनि/कावि/१८३०/२०१६, दि.११/०८/२०१६, खनिकर्म/ कावि/ १०८/ २०१७, दि.१६/०१/२०१७ च्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, पुणे जिल्ह्यातील सन २०१३-१४ या वर्षाच्या लिलावात श्री. संदिप संभाजी फराटे यांना मौजे वाटलुज, ता. दौंड या वाळूगटातील २६७४ ब्रास वाळूचा लिलाव रू. ७१,००,०००/- एवढ्या रकमेस मंजूर केला होता. लिलावानुसार सर्व रक्कम शासन जमा केल्यानंतर, दि.२१.१.२०१४ च्या आदेशान्वये लिलाव मंजूर करून, दि. २२.१.२०१४ रोजी वाळूगटाचा ताबा देण्यात आला.

श्री. फराटे यांनी उजनी धरण भिमा उपसा सिंचन विभागाने मौजे वाटलूज क्र.१ या वाळूगटातील वाळू उपसा बंद केल्यामुळे, मंजूर वाळूचे उत्खनन करता न आल्याने, शिल्लक वाळूच्या उत्खननासाठी बदली वाळूगट देण्याबाबत अथवा प्रमाणशिर रक्कम परत करण्याबाबत तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांच्यासमोर अपील अर्ज दाखल केला होता. सदर अपील अर्जामध्ये तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांनी दि.२५.६.२०१५ रोजी आदेश पारित करुन, मौजे कुंभारगांव या वाळूगटातून २४६२ ब्रास वाळूचे उत्खनन व वाहतूकीस परवानगी देण्याचे आदेश पारित केले.

सदर आदेशानुसार मौजे कुंभारगाव या वाळूगटातून वाळू उत्खननासाठी पर्यावरण अनुमती मिळण्याचा प्रस्ताव राज्य पर्यावरण समितीसमोर सादर केला असता, समितीने मौजे कुंभारगांव उजनी जलाशयाच्या पाणी साठ्यामध्ये असल्याने पर्यावरण अनुमती नाकारली. त्यामुळे मौजे कुंभारगांव येथील वाळूगटातून वाळू उत्खननास परवानगी देता आली नाही.

श्री. फराटे यांनी तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांच्या आदेशानुसार वाळू उत्खननास परवानगी देण्याबाबत मा. मुंबई उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्र.११८४२/२०१५ मध्ये, मा. उच्च न्यायालयाने दि.२३.६.२०१६ रोजी दिलेल्या आदेशामध्ये, सहायक सरकारी वकील यांनी तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांच्या आदेशाची चार आठवड्यात अंमलबजावणी करण्यात येईल हे विधान ग्राह्य धरून सदर याचिका निकाली काढली आहे.

तथापि, जलसंपदा विभागाने दि. १०.११.२०१६ च्या पत्रान्वये उजनी प्रकल्पाच्या बुडीत क्षेत्राच्या गावातील स्थळांचा वाळू लिलावासंदर्भातील अधिसूचना स्थगित करण्याबाबत जिल्हाधिकारी पुणे, सोलापूर, अहमदनगर यांना कळविले. तसेच राज्यातील मोठ्या प्रकल्पातून गाळ व गाळमिश्रीत वाळूचे निष्कासनाबाबत नविन धोरण ठरविण्यात येणार असून त्याअनुषंगाने उजनी जलाशयाच्या बुडीत क्षेत्रातील वाळूस्थळांची लिलावप्रक्रिया करण्यास जलसंपदा विभागाने हरकत घेतली.

श्री. फराटे यांनी रिट याचिका क्र. ११८४२/२०१५ मधील मा. उच्च न्यायालयाच्या आदेशाची पूर्तता न केल्याने मा. उच्च न्यायालयात अवमान याचिका क्र. ३५/२०१७ दाखल केली. सदर अवमान याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.१४/१२/२०१८ रोजी २४६२ ब्रास वाळूसाठ्याची रक्कम तसेच सदर रकमेवर ७ टक्के व्याजाची रक्कम परत करण्याबाबतचे आदेश दिले आहेत. सबब, श्री. संदीप फराटे यांना २४६२ ब्रास वाळूसाठ्यापोटी रू. ६५,३७,०७८/- व सदर रकमेवर ७ टक्के व्याज रू.१६,०१,५८२/- एवढी रक्कम अदा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सबब, लिलावधारक श्री. संदीप फराटे यांना रु. ६५,३७,०७८/- (अक्षरी **रुपये पासष्ट लाख सदतीस हजार अठ्याहत्तर फक्त)** व व्याजाची रक्कम रू.१६,०१,५८२/- **(अक्षरी रुपये सोळा लाख एक हजार पाचशे ब्याऐंशी फक्त)** इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. याबाबीवर होणारा खर्च **रु. ६५,३७,०७८/-** सन २०१८-१९ यावर्षाकरीता लेखाशिर्ष, "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

तसेच, व्याजाची रक्कम **रू. १६,०१,५८२/-** सन २०१८-१९ या वर्षाकरीता "मागणी क्र. सी-१, "२०५३ जिल्हा प्रशासन" ०९३-जिल्हा आस्थापना, (०१) - सर्वसाधारण आस्थापना, (०१)(०३) **आयुक्त पुणे (अनिवार्य), (२०५३ ००६४)** या लेखाशिर्षाखाली, १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

४. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३५ अ/२०१९/व्यय-९, दिनांक १८.०१.२०१९ अनुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०६१७२७११८२१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, serialNumber=aa3985b8c1804418574f1872e9908934b35fbd2a705aaf56c57fbd437a59270d, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2019.02.06 17:55:01 +05'30'

**( राजेंद्र क्षीरसागर)**

सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे

जिल्हाधिकारी पुणे, पुणे.

**प्रत:**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.

२) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई -४०० ०२०.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

४) वित्त विभाग, (व्यय-९,अर्थसंकल्प -३, ६ व १४ कार्यासने) हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.

५) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.

६) निवडनस्ती ख कार्यासन, महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.